ग्रामीण रुग्णालय, चिखली जि. बुलढाणा येथील ३० खाटांचे ५० खाटांच्या उपजिल्हा रुग्णालयामध्ये श्रेणीवर्धनाच्या बांधकामाच्या अंदाजपत्रक व आराखड्यांना प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
सार्वजनिक आरोग्य विभाग
शासन निर्णय, क्रमांकः प्रशामा २०१८/प्र.क्र.४३/आरोग्य ३
१० वा मजला, संकुल इमारत,
जी.टी. रुग्णालय आवार, मुंबई - ४०० ००१.
दिनांक : २४ ऑक्टोंबर, २०१८.

वाचा :

१) आरोग्य सेवा संचालनालय यांचे पत्र क्रमांक : संआसे/ कक्ष-३/टे-६/चिखली५०खाटाबांधकाम/१५९९-१६००/१८, दिनांक १६.०२.२०१८.

प्रस्तावना :

ग्रामीण रुग्णालय, चिखली जि. बुलढाणा येथील ३० खाटांचे ५० खाटांच्या उपजिल्हा रुग्णालयात श्रेणीवर्धन इमारतीचे बांधकामाच्या रुपये ४९९.९७ लक्ष एवढ्या रकमेच्या अंदाजपत्रक व नकाशांना प्रशासकीय मान्यता देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

शासन निर्णय :

२. ग्रामीण रुग्णालय, चिखली जि. बुलढाणा येथील ३० खाटांचे ५० खाटांच्या उपजिल्हा रुग्णालयात श्रेणीवर्धन इमारतीचे बांधकामाचे अंदाजपत्रक उप मुख्य वास्तुशास्त्रज्ञ साव्रजनिक बांधकाम विभाग, नागपूर यांनी तयार केलेल्या नकाशावर आधारीत आहे. सदर अंदाजपत्रकामध्ये इमातरीच्या बांधकामासह विद्युतीकरण, पाणीपुरवठा, व मलनि:स्सारण, अंतर्गत रस्ते, व सी.सी. ड्रेन्स, पार्किंग व्यवस्था, रेन वॉटर हार्वेस्टिंग, अग्नि प्रतिबंधक, हरित इमारत संकल्पना, फर्निचर इत्यादी बाबीचा समावेश करण्यात आला आहे. वस्तू व सेवा करा करीता १२ टक्के तरतूद करण्यात आली आहे. इत्यादी तरतूद करण्यात येवून रुपये ७२०.०७ लक्ष एवढ्या रकमेच्या खालील प्रमाणे त्याखालील खालील अटी व शर्तींच्या अधिन राहून या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे :-

**RECAPITULATION SHEET**

| Sr. No. | Particulars of Items | Norms Unit Rate Rs. per Sqmt./Meter/lump Sum | Cost Rs. |
|---|---|---|---|
| A | Essentail Items | | |
| 1 | Building proper (Scope) | | |
| | a) Area (Sqmt) 957.73 | 22000 per Sqmt. | 2,10,70,060 |
| | b) Number of Floors GF | | |
| | a) Area (Sqmt) 895.38 | 2000 per Sqmt. | 1,96,98,360 |
| | b) Number of Floors FF | | |
| | **d) Cost of Construction** | | 4,07,68,420 |
| 2 | Electrification | | |
| | Internal | 5% of 1 (d) | 20,38,421 |
| | | 6% of 1 (d) | 24,46,105 |
| | | Total | 44,84,526 |
| 3 | Water Supply and sanitation | 5% of 1 (d) | 20,38,421 |
| 4 | Miscellaneous Items | | |
| | Internal Roads & C.C.Drains | Lump Sum | 10,00,000 |
| | Parking Arrangements | Lump Sum | 5,00,000 |
| | Rain water harvesting | 1% of 1 (d) | 4,07,684 |
| | Fire Fighting Arrangements | 2% of 1 (d) | 8,15,368 |
| | Green Building Concept | 5% of 1 (d) | 20,38,421 |
| | Furniture 1853.11 | 2500 per Sqmt | 46,32,775 |
| | | Lump sum | 5,00,000 |
| | | Total | 98,84,249 |
| | Sub Total = (1)+(2)+(3)+(4) | **(A)** | **5,71,85,616** |
| B | Optional Items | | |
| | Bore well & Pump House, etc | Lump sum | 5,00,000 |
| | | **(B)** | **5,00,000** |
| | | **Project (A) + (B)** | **5,76,85,616** |
| | Add 4% for GST on (d) | | 16,30,737 |
| | Add 10% for price variation on (T) | | 57,68,562 |
| | Add 12% for GST on (T) | | 69,22,274 |
| | TOTAL COST OF PROJECT | | 7,20,07,188 |
| | Say Rs. Lakhs | | 720.07 |

अटी व शर्ती :-

१) कामासाठी निविदा मागविण्याआधी सदर कामास सार्वजनिक बांधकाम विभागातील सक्षम अधिकाऱ्यांची तांत्रिक मंजुरी घेणे आवश्यक राहील.

२) सदर कामाची वेगवेगळी निविद न करता सर्व कामाची एकत्रित निविदा करण्यात यावी.

३) कामासाठीच्या जागेची उपलब्धता, योग्यता व जागा पुरेशी आहे किंवा नाही याबाबतची खात्री संबंधित आरोग्य संस्था प्रमुखांनी करावी.

४) क्षेत्रिय जागेच्या परिस्थितीनुसार व आरोग्य संस्थांच्या आवश्यकतेनुसार प्रस्तावित कामाची किंमत वाढणे शक्य असल्यामुळे त्यासाठी आवश्यक प्रस्ताव सार्वजनिक बांधकाम विभागाच्या त्यात्या- भागाच्या क्षेत्रिय अधिकाऱ्यांकडून करुन घ्यावेत.

५) सदरचे अंदाजपत्रक हे ढोबळ नमुना अंदाजपत्रक असल्याने, या कामांच्या सविस्तर अंदाजपत्रकांना तांत्रिकदृष्ट्या मान्यता ही सार्वजनिक बांधकाम खात्याच्या त्यात्या- क्षेत्राच्या सक्षम अधिकाऱ्यांकडून करण्यात येईल.

६) सदरचे काम नवीन नमुना नकाशांप्रमाणे करावयाचे झाल्यास सार्वजनिक आरोग्य विभागाने नियुक्त केलेल्या खाजगी वास्तुशास्त्रज्ञामार्फत नकाशांप्रमाणे वास्तुमांडणी आराखडा मंजूर करुन घेण्यात यावा. तसेच स्थानिक ग्रामीण नगर विकास संस्थेच्या संबंधित नियमानुसार बांधकाम परवानगी तसेच भोगवटा प्रमाणपत्र मिळविण्याची जबाबदारी सदर नवनियुक्त वास्तुशास्त्रज्ञ व जिल्हा शल्य चिकित्सक यांची राहील. तसेच ही परवानगी मागण्यासाठीचा पत्रव्यवहार जिल्हा शल्यचिकित्सक यांच्या स्वाक्षरीने करण्यात यावा.

७) सार्वजनिक बांधकाम विभागाच्या मुख्य/ उपमुख्य वास्तुशास्त्रज्ञाकडून या कामांच्या नकाशे व वास्तुमांडणी आराखड्यांना वेगळ्या मंजूरीची आवश्यकता नाही.

८) प्रत्यक्ष काम करतेवेळी पर्यावरण विभाग, शासन निर्णय क्र.इएनव्ही-२०१३/प्र.क्र.१७७/तां.क.१ दि. १० जानेवारी,२०१४ मध्ये उल्लेख करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्वांनुसार कार्यवाही करण्यात यावी.

३. ग्रामीण रुग्णालय, चिखली जि. बुलढाणा येथील ३० खाटांचे ५० खाटांच्या उपजिल्हा रुग्णालयात श्रेणीवर्धन इमारतीचे बांधकामावरील खर्च सदर कामावरील खर्च मागणी क्रमांक- एच- ८, मुख्यलेखाशिर्ष "४२१०- वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य सेवा यावरील भांडवली खर्च, ०१- नागरी आरोग्य सेवा (वैद्यकीय सहाय्य-( पंचवार्षिक योजनांतर्गत योजना- इमारती, ११०- रुग्णालय व दवाखाने, (१)(अ( पंचवार्षिक योजनांतर्गत योजना- इमारती, (००)(०१) मोठी बांधकामे (४२१०००१४), ५३- मोठी बांधकामे" याखाली भागविण्यात येईल.

४. ग्रामीण रुग्णालय, चिखली जि. बुलढाणा येथील ३० खाटांचे ५० खाटांच्या उपजिल्हा रुग्णालयात श्रेणीवर्धन इमारतीचे बांधकामासाठी लागणाऱ्या रकमेची अर्थसंकल्पात तरतूद करण्याचा प्रस्ताव संचालक, आरोग्य सेवा, मुंबई यांनी त्वरीत शासनास सादर करावा.

५. हे आदेश शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक- विअप्र २०१३/प्र.क्र.३०/विनियम, दिनांक १७.०४.२०१५ सोबतच्या परिशिष्ट, भाग पहिला, उपविभाग-पाच मधील अनुक्रमांक-१, परिच्छेद क्रमांक- १३४ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८१०२३११२४४३१४१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Roshani Dinesh Kadam Patil

Digitally signed by Roshani Dinesh Kadam Patil
DN: CN = Roshani Dinesh Kadam Patil, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Public Health Department
Date: 2018.10.24 12:52:46 +05'30'

**( रो.दि. कदम पाटील )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रत,

१. महालेखापाल, महाराष्ट्र- १/ २ (लेखा परिक्षा / लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/ नागपूर.
२. संचालक, आरोग्य सेवा, मुंबई.
३. संनियंत्रक तथा मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, अमरावती.
४. सह संचालक, आरोग्य सेवा (रुग्णालये), मुंबई.
५. उप संचालक, आरोग्य सेवा मंडळ, अकोला.
६. जिल्हा शल्य चिकित्सक, जिल्हा रुग्णलय, बुलढाणा
७. अधिक्षक, जिल्हा रुग्णालय, बुलढाणा
८. कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, बुलढाणा.
९. उप अभियंता, सार्वजनिक बांधकाम उपविभाग, चिखली, जि. बुलढाणा.
१०. जिल्हा कोषागार अधिकारी, जि. बुलढाणा.
११. सार्वजनिक बांधकाम विभाग (इमा-२), मंत्रालय, मुंबई.
१२. कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३. निवडनस्ती (आरोग्य-३).